**सामाजिक न्याय विभागाच्या विशेष घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जातीच्या कृषीपंप ग्राहक लाभार्थ्यांना वीज दरात सवलतीसाठी सन २०२२-२३ मध्ये अनुदान वितरण मागणी क्र.एन-३ (मुख्यलेखाशिर्ष २८०१५६६१).**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. निधिवी-२०२२/प्र.क्र.६४/ऊर्जा-३,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १५ मार्च, २०२३.

<u>संदर्भ:</u> १. वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.०४/०४/२०२२
२. महावितरण कंपनीचे पत्र क्र.पी.कॉम/शासन/मागणी/सवलत/SCP/१०८७३,दि.२९एप्रिल,२०२२
३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.४५/अर्थसंकल्प (विघयो), दि.१३ जुलै,२०२२.
४. महावितरण कंपनीचे पत्र क्र.पी.कॉम/शासन/मागणी/सवलत/SCP/३१०५८,दि.०५ डिसेंबर,२०२२
५. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.६५/अर्थसंकल्प (विघयो), दि.१८ जानेवारी,२०२३
६. वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.०८/०२/२०२३
७. महावितरण कंपनीचे पत्र क्र.पी.कॉम/शासन/मागणी/सवलत/SCP/०३५३९,दि.०९फेब्रुवारी,२०२३
८. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.६५/अर्थसंकल्प (विघयो), दि.१०मार्च,२०२३

<u>प्रस्तावना</u> :-

राज्यातील कृषीपंपधारकांना दरवर्षी सवलतीच्या दरात वीज पुरवठा करण्यात येतो व त्याची प्रतिपूर्ती करण्यासाठी महावितरण कंपनीस अर्थसहाय्य देण्यात येते. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनुसूचित जाती विशेष घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती घटकांतर्गत वैयक्तिक लाभार्थी कृषीपंपधारकांना वीज दरात सवलत देण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने सन २०२२-२३ करिता महावितरण कंपनीस अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्यासाठी रु.१००.०० कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद केली आहे.

२. सदर तरतुदीपैकी वित्त विभागाच्या संदर्भिय शासन निर्णय क्र. १ व ६ मधील सुचनांच्या अनुषंगाने व वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भिय शासन निर्णय क्र. ३ व ५ अन्वये रु. ४२.०० कोटी इतकी उपलब्ध केलेली तरतूद ऊर्जा विभागाकडून महावितरण कंपनीस वितरित करण्यात आली आहे. आता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने उर्वरित रु. ५८.०० कोटी इतकी तरतूद संदर्भिय शासन निर्णय क्र. ५ अन्वये महावितरण कंपनीस वितरित करण्यासाठी प्रशासकीय विभाग म्हणून ऊर्जा विभागास अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिली आहे. सदर तरतूद रु. ५८,००,००,०००/- (रुपये अठ्ठावन्न कोटी फ़क्त) महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्याची बाब विचारधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनुसूचित जाती विशेष घटक कार्यक्रमांतर्गत वैयक्तिक लाभार्थी कृषीपंपधारकांना वीज दरात सवलत देण्यासाठी रु. ५८,००,००,०००/- (रुपये अठ्ठावन्न कोटी फ़क्त) महावितरण कंपनीस वितरित करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम फ़क्त अनुसूचित जाती घटकांतर्गत लाभार्थ्यांवरच वीज दरात सवलतीपोटी खर्च होईल याची दक्षता विभाग स्तरावर ऊर्जा-५ कार्यासनाने तसेच महवितरण कंपनीने घ्यावी. तसेच ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहील.

३. वरील बाबींचा खर्च "मागणी क्र. एन-३, २८०१ वीज, उप मुख्यलेखाशिर्ष ०५ पारेषण व वितरण,गौणशिर्ष ७८९ अनुसूचित जाती घटक योजना, गट शिर्ष (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना उप गट शिर्ष (०१)(०२) कृषीपंप ग्राहकांना वीज दरात सवलत (कार्यक्रम) योजना सांकेतांक (२८०१५६६१) ३३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्यामार्फ़त कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित,मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.ना.रा.ढाणे, अवर सचिव (ऊर्जा-३) आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. नारायण. श्री.कराड, उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी सदर मंजूर झालेली रक्कम रु. ५८,००,००,०००/- (रुपये अठ्ठावन्न कोटी फ़क्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांचे नावे स्वतंत्ररीत्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

५. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दि.०४/०४/२०२२ च्या परिपत्रकातील तपासणी अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक १०/०३/२०२३ च्या शासन निर्णयानुसार व वित्त विभागने दिनांक ०४/०४/२०२२ रोजीच्या परिपत्रकन्वये मान्यता दिल्यानुसार सदर निधी वितरित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३१५१३०८५६५०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2023.03.15 13:13:26 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री, यांचे सचिव (ऊर्जा) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. विरोधीपक्ष नेता ( विधानसभा व विधानपरिषद) मुंबई-३२यांचे खाजगी सचिव.
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.

८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई.
१०. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग मंत्रालय,मुंबई-३२.
११. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड,वांद्रे (पूर्व),मुंबई-५१.
१२. आयुक्त,समाज कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे.
१३. सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प-विघयो)मंत्रालय,मुंबई-३२.
१४. उप सचिव (ऊर्जा-५)उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१५. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई-३२.
१६. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१७. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
१९. अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
२०. कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२१. वित्त विभाग (व्यय-१४) साधनसंपत्ती/अर्थसंकल्प, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२२. निवडनस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.